शिक्षण खात्याचा मंजुरी क्रमांक : पापुमं/१०८९/बाभाम/१५८२ (१) स, दि. २२/१२/१९८९

इयत्ता दुसरी
मराठी

# बालभारती





महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

प्रथमावृत्ती : १९९०
पुनर्मुद्रण : १९९६



मराठी भाषा समिती :
डॉ. मधुकर आष्टीकर, अध्यक्ष
डॉ. भाऊ मांडवकर, सदस्य
श्री. दया पवार, सदस्य
श्री. व्यंकटेश चौधरी, सदस्य
श्री. नरहर मंद्रुपकर, सदस्य
श्रीमती प्रतिभा जंगले, सदस्य
श्रीमती ज्ञानदा नाईक, प्र. विशेषाधिकारी मराठी

चित्रकार : श्री. जयप्रकाश जगताप, पुणे

मुखपृष्ठ : श्री. महादेव जामसंडेकर, मुंबई.

निर्मिती :
श्री. म. द. गाडेकर, निर्मिती अधिकारी
श्री.नितिन तांबे, निर्मिती सहाय्यक

फोटोसेटिंग :
अक्षर फोटोटाइपसेटर्स, यशोदा सदन, सखाराम कीर मार्ग, मुंबई-४०० ०१६.
टाईप :— मजकूर २० पॉईंट बोल्ड : स्वाध्याय २० पॉईंट साधा

कागद : ६१ × ८६ सेमी/ ६० ग्रॅम क्रीम व्होव

प्रकाशक :
श्री.पी.वाय.साळवी, नियंत्रक
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, मुंबई ४०००१८.

मुद्रक :
राजा पाटील, पाटील प्रिंटर्स,
२३, वडाळा उद्योग भवन, मुं. ३१.

मुद्रणादेश क्र एन./पीटीजी/टि.बी./ १९९६ – ९७ (0.50)

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे.
सारे भारतीय माझे
बांधव आहेत.
माझ्या देशावर माझे प्रेम आहे.
माझ्या देशातल्या समृद्‌ध आणि
विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे.
त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता
माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.
मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा
आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन
आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.
माझा देश आणि माझे देशबांधव
यांच्याशी निष्ठा राखण्याची
मी प्रतिज्ञा करीत आहे.
त्यांचे कल्याण आणि
त्यांची समृद्‌धी
ह्यांतच माझे
सौख्य सामावले
आहे.

# प्रस्तावना

'राष्ट्रीय शैक्षणिक धोरण १९८६'नुसार महाराष्ट्र राज्यात 'प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम १९८८' हा तयार करण्यात आला.

या शासनमान्य अभ्यासक्रमावर आधारित मराठी विषयाची इयत्ता १ ली ते इ. ८ वीची नवीन 'बालभारती' माला १९८९-९० या शालेय वर्षापासून पाठ्यपुस्तक मंडळ क्रमशः प्रकाशित करत आहे. या मालेतील हे दुसरे पुस्तक आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

आकलन व अभिव्यक्ती साधली की भाषा अवगत झाली असे म्हणता येते. त्यासाठी वाचन, श्रवण, संभाषण, लेखन यांची कौशल्ये आत्मसात करणे अगत्याचे ठरते. बालभारतीने या उद्देशानेच गतवर्षी पहिलीचे पुस्तक प्रकाशित केलेले आहे. आत्मसात केलेली वरील कौशल्ये अधिकाधिक विकसित करण्याचा उद्देश आता डोळ्यांपुढे आहे. स्वाध्यायांचे अनन्यसाधारण महत्त्व लक्षात घेणे आवश्यक आहे. पाठ व स्वाध्याय परस्परांचे अविभाज्य अंग आहे.

हे पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार व्हावे या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील निवडक शिक्षक, तसेच काही शिक्षणतज्ज्ञ व विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले. आलेल्या सूचना व अभिप्राय यांचा मराठी भाषा समितीने योग्य तो विचार करून या पुस्तकाला अंतिम स्वरूप दिले आहे. त्यांनी दिलेल्या सहकार्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे.

मंडळाची मराठी भाषा समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमातून हे पुस्तक तयार झाले आहे. हे पाठ्यपुस्तक तयार करताना मराठी भाषा समितीला अनेक साहित्यिकांची आणि तज्ज्ञांची मदत झाली: त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

अध्ययन व अध्यापन प्रभावी व्हावे यासाठी या पुस्तकाची अध्यापनपुस्तिका मंडळाने प्रकाशित केली आहे. शिक्षक व सुजाण पालक यांना ही अध्यापनपुस्तिका उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

विद्यार्थी, पालक व शिक्षक या पुस्तकाचे स्वागत करतील अशी आशा आहे.

पुणे:
दिनांक २७-३-९०
वर्ष प्रतिपदा
चैत्र ६, शके १९१२

संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

# अनुक्रमणिका

# १. गवताचं पातं



गवताचं पातं वाऱ्यावर डोलतं
डोलताना म्हणतं, खेळायला चला

झऱ्यातलं पाणी खळाखळा हसतं
हसताना म्हणतं, पळायला चला

निळं निळं पाखरू आंब्यावर गातं
गाताना म्हणतं, नाचायला चला

झिम्मड पावसात गारांची बरसात
बरसात म्हणते, वेचायला चला



छोटासा मोती, लपाछपी खेळतो
धावताना म्हणतो, शिवायला चला

मनीचं पिल्लू पायाशी लोळतं
लोळताना म्हणतं, जेवायला चला

झिम्मड पाऊस – जोराचा पाऊस.
मोती – कुत्र्याचे नाव.



# २. गुहा बोलते

एक जंगल होते. त्यात एक सिंह राहत होता. एकदा त्याला काहीच शिकार मिळाली नाही. तो भुकेने व्याकूळ झाला. फिरता फिरता तो एका गुहेत शिरला. तेथे त्याला थंडगार वाटले. तो झोपला.



ती गुहा एका कोल्ह्याची होती. कोल्हा शिकार मिळवायला जंगलात गेला होता. थोड्या वेळाने सिंह जागा झाला. त्याला समोरून गुहेकडे येणारा कोल्हा दिसला. सिंह मागे सरकला व लपून बसला. आता आयती शिकार सापडणार म्हणून तो खूश झाला. कोल्हा आत येण्याची तो आतुरतेने वाट पाहू लागला.



कोल्हा गुहेजवळ आला. त्याला गुहेजवळ सिंहाच्या पावलांचे ठसे दिसले. तो तेथेच थांबला. त्याने पाहिले, की सिंहाच्या पावलांचे ठसे आत जाणारे आहेत, पण बाहेर येणारे नाहीत. तेव्हा सिंह आतच दडून बसलेला असावा.

कोल्ह्याला युक्ती सुचली. तो मोठ्याने म्हणाला, "अग गुहे, रागावलीस का? तू रोज माझं स्वागत करतेस, आज अशी गप्प का बसलीस?"

सिंहाला वाटले, गुहा रोज बोलत असावी. आज आपल्याला पाहून घाबरलेली दिसते, त्यामुळे ती बोलत नसावी; म्हणून तोच आतून म्हणाला, "मी गुहा बोलतेय. कोल्हेभाऊ, आत या. दमलात का?"

कोल्ह्याने सिंहाचा आवाज ओळखला. गुहेत गेलो तर सिंह खाऊन टाकील. इथून पळून जाणेच चांगले, असा विचार करून कोल्हा धावत सुटला.

पुन्हा तो गुहेत परत आला नाही.

---

**व्याकूळ** – कासावीस. **गुहा** – डोंगरातील पोकळ जागा.



# ३. मोर



मोर हा सुंदर व रुबाबदार पक्षी आहे. त्याला मोहक रंगांची लांब पिसे असतात. पिसांवर हिरव्या-निळ्या रंगांचे डोळे असतात. त्याभोवती तांबूस रंगाची किनार असते. मोराची पिसे सगळ्यांना फार आवडतात. मोराचे शरीर करड्या रंगाचे असते. त्याच्या डोक्यावर एक लांब तुरा असतो. तो मुकुटासारखा दिसतो. मोराला पक्ष्यांचा राजा म्हणतात. तो आपला राष्ट्रीय पक्षी आहे.

आकाशात मेघ आले, की मोराला आनंद होतो. तो पिसारा फुलवून नाचू लागतो. मोर नाचायला लागला,की लांडोरही नाचते.

मोराच्या मादीला लांडोर म्हणतात. ती मोरापेक्षा आकाराने लहान असते. तिचा रंग तपकिरी असतो. तिच्या गळ्याजवळ मात्र हिरवा रंग चकाकतो.

मोर जंगलाच्या जवळपास राहतो. रात्री झाडावर झोपतो. चरण्यासाठी मोकळ्या प्रदेशात सकाळी व संध्याकाळी फिरतो. तो 'मियाँओ, मियाँओ' असे ओरडतो. सगळे रान दणाणून सोडतो. मोराचे घरटे झुडपात असते. तो एक खड्डाच असतो. तो वाळलेल्या काड्या आणि पाने यांनी झाकलेला असतो. दाणे, कंदमुळे, कोवळ्या वनस्पती, किडे, साप वगैरे त्याचे अन्न आहे.

मोराचे डोळे व कान खूप तिखट असतात. त्यामुळे त्याला पकडणे कठीण जाते. थोडा जरी संशय आला, तरी तो झुडपात लपून बसतो. त्याच्यावर हल्ला झाला तर तो कर्कश ओरडतो. पंखांची फडफड करत बाणासारखा सरळ उडतो.

मोराची चित्रे आणि गाणी सगळ्यांना आवडतात. 'नाच रे मोरा, आंब्याच्या बनात' हे सुंदर गाणे तर मुलांना वेड लावते.



# ४. पीक

गाई, गाई दूध दे
दूध दिले वासराला

वासरा, वासरा बळ दे
बळ दिले नांगराला

नांगरा, नांगरा फाळ दे
फाळ दिला जमिनीला

जमिनी, जमिनी कस दे
कस दिला कणसाला

कणसा, कणसा दाणे दे
पसा पसा भरून घे.





## ५. साहस

विनायक नावाचा एक साहसी मुलगा होता. तो सर्वांना फार आवडायचा. त्याला बरेच मित्र होते. ते सगळे एका खोलीत जमत. विनायक त्यांना गोष्टी सांगायचा. गोष्टीत रंग भरायचा.

एक दिवस तो झाशीच्या राणीची गोष्ट सांगत होता. राणी घोड्यावर बसली होती. तिच्या पाठीशी मूल होते. ती शूरपणे लढत होती. इंग्रजांना सांगत होती, ''मी प्राण देईन, पण माझी झाशी देणार नाही.''

गोष्ट रंगात आली. इतक्यात कुठून तरी आवाज आला. 'फुस्स्... फुस्स्'. सारे इकडे तिकडे पाहू लागले. पुन्हा तोच आवाज आला.

'कसला आवाज येतो आहे, साप तर नसेल?' सर्वांनी निरखून पाहिले. कोपऱ्यात खरोखरच नाग होता. मुले घाबरली. विनायक मात्र घाबरला नाही. जवळच एक सांडशी पडलेली होती, त्याने ती उचलली. तो नागाजवळ जाऊ लागला. मुले ओरडली, ''अरे! तो नाग आहे. चावेल तुला. फीर मागं!''



विनायकने नागाचे तोंड सांडशीने घट्ट धरले व नागाला वर उचलले. नाग त्याच्या हाताला वेटोळे घालू लागला. मुले घाबरून म्हणाली, ''अरे, सोड. सोड त्याला. तो चावेल.''

विनायकने त्या नागाची पकड अधिकच घट्ट केली व म्हणाला, ''अरे, नागाला भ्यालात, मग इंग्रजांशी कसे लढणार?'' विनायकने घट्ट धरल्यामुळे तो नाग अर्धमेला झाला. विनायकने लगेच त्याला दूर फेकून दिले.

या वेळी या मुलाचे वय बारा वर्षांचे होते. हा मुलगा म्हणजेच स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर!

---

**साहस** — धाडस. **निरखून पाहणे** — बारकाईने बघणे.

# ६. शूर शिवबा

## प्रवेश पहिला

(पुण्यातील वाडा. जिजामाता खिडकीजवळ उभ्या आहेत.)



जिजामाता : रात्र झाली आहे. बाहेर पाऊस पडत आहे. माझा शिवबा अजून कसा आला नाही?

शिवाजी : (प्रवेश करत) मासाहेब, हा मी आलो, तुमचा शिवबा. (जिजामातेला वाकून नमस्कार करतो.)

जिजामाता : (शिवबाला जवळ घेऊन) कुठं होतास एवढी रात्र होईपर्यंत? तुझी फार काळजी वाटते.

शिवाजी : काळजी कशाला करायची? मी एकटा थोडाच फिरतो? येसाजी कंक, तानाजी मालुसरे आणि बाजी पासलकर असतात माझ्याबरोबर.

जिजामाता : पण एवढा पाऊस पडत असताना काय करत होतात अंधारात तुम्ही?

शिवाजी : तो पहा. तो दूर तोरणा किल्ला दिसतो आहे ना, तो घेतला पाहिजे की नाही?

जिजामाता : किल्ला घेणार?

शिवाजी : होय मासाहेब. सुलतानाची चाकरी करू नकोस, असं तुम्हीच सांगितलं आहे ना? मग स्वतःचं राज्य हवं, त्यासाठी किल्ला हवा.

जिजामाता : पण किल्ला घ्यायला लढाई करावी लागेल ना?

शिवाजी : आमची तयारी आहे त्यासाठी. पाचशे मावळे तयार आहेत, तलवार आणि ढाल घेऊन लढायला!

जिजामाता : एवढे मावळे कसे मिळवले तुम्ही?



शिवाजी : त्यांना स्वराज्याचं महत्त्व समजावून सांगितलं. आज ते सुलतानाची चाकरी करत आहेत. दिवसभर श्रम करतात तरी पोटभर अन्न मिळत नाही. त्यांची मुलंबाळं उपाशी राहतात. अंगावर घालायला कपडे नसतात. स्वत:चं राज्य आलं की असे हाल होणार नाहीत, हे पटलं त्यांना!

जिजामाता : पण किल्ल्यावर खूप सैन्य असेल, शिवाय किल्लेदार शूर आहे.

शिवाजी : त्यासाठी आम्ही एक युक्ती केली आहे.

जिजामाता : काय?

शिवाजी : या पावसात रातोरात आम्ही किल्ल्यावर हल्ला करणार आहोत. तिथं फार थोडे शिपाई आहेत. किल्लेदारदेखील तिथं नाही.

जिजामाता : तो कुठं गेला?

शिवाजी : पावसाळा लागला की तो किल्ला सोडतो. खाली गावात जाऊन राहतो. त्याचं सैन्यही त्याच्याबरोबरच असतं.

जिजामाता : हे तुम्हांला कसं कळलं?

शिवाजी : आमच्या गुप्तहेरांनी ही बातमी आणली आहे. तेव्हा मासाहेब, आम्हांला आशीर्वाद द्या. आम्ही किल्ल्यावर स्वारी करायला निघालो आहोत. बाहेर पावसात मावळे उभे आहेत.

जिजामाता : पण शिवबा, तुझं वय जेमतेम सोळा वर्षांचं —

शिवाजी : म्हणून काय झालं? मला दादोजी कोंडदेवांनी लढण्याचं शिक्षण दिलं आहे. आमच्या पराक्रमाबद्दल तुम्हांला शंका वाटते का?



जिजामाता : नाही शिवबा. जा. गरीब मावळ्यांच्या सुखासाठी जरूर लढायला जा. स्वराज्य मिळवण्यासाठी पराक्रम गाजवा. यशस्वी व्हा. (शिवबा जिजामातेला वाकून नमस्कार करतो. जिजामाता शिवबाला आशीर्वाद देतात. शिवबा जातो. बाहेर मावळ्यांच्या गर्जना ऐकू येतात.)

## प्रवेश दुसरा

(तोच वाडा. आता पहाट झाली आहे. जिजामाता काळजी करत आहेत. खिडकीतून एकसारख्या बाहेर पाहत आहेत.)

जिजामाता : देवी शिवाई! माझ्या शिवबाचं रक्षण कर. (तेवढ्यात एक दासी येते.)

दासी : मासाहेब, शिवाजीराजांनी लढाई जिंकली. तोरणा किल्ला घेतला. तो पहा त्या किल्ल्यावर भगवा झेंडा फडकतो आहे.

जिजामाता : धन्य आहे तुझी शिवबा. तोरणा किल्ला घेऊन तू स्वराज्याचं तोरण बांधलंस. मला तुझा खूप अभिमान वाटतो.

(बाहेर शिंग-तुतारी वाजते. 'हिंदवी स्वराज्याचा जयजयकार असो — शिवरायाचा जयजयकार असो' असे लोकांचे आवाज ऐकू येतात.)



## ७. फुलपाखरा



फुलपाखरा ये इकडे
छान गडे तू छान गडे
सुंदर सुंदर रंगांनी
रंगविले तुजला कोणी?

पंख कसे इवले इवले
उडसी पळसी त्याचमुळे
मऊ मऊ तव अंग किती
किति करसी गमतीजमती!

खूप मला रे मित्र जरी
आवडसी तू खरोखरी
तुजसंगे धावायाला
मौज वाटते फार मला!



लपंडाव चल खेळूया
नाचूया रे बागडुया
फुलपाखरा ये इकडे
छान गडे तू छान गडे!

**इवले इवले** — लहान लहान.
**बागडणे** — आनंदाने उड्या मारणे

# ८. दिनूचे बिल

दिनूचे वडील डॉक्टर होते. दिनू कधी कधी त्यांच्याबरोबर दवाखान्यात जात असे. तेथे पुष्कळसे लोक येत. कोणी तपासून घेण्यासाठी येत. कोणी औषध घेण्यासाठी येत. कोणी म्हणे, 'डॉक्टर, माझं पोट दुखतं, मला तपासा.' तर कोणी म्हणे, 'डॉक्टर, माझं बिल किती झालं आहे ते सांगा.'

दिनू एका लहानशा खुर्चीवर बसून ते सारे पाहत असे आणि ऐकत असे. दवाखान्यातल्या बऱ्याचशा गोष्टी त्याला आता कळू लागल्या होत्या, पण बिल म्हणजे काय ते अजून त्याला कळले नव्हते.

दिनूने एके दिवशी वडिलांना विचारले, ''बाबा, बिल म्हणजे काय हो?''

डॉक्टरांनी टेबलावरचा एक कागद घेतला आणि दिनूला दाखवला, ''हे बघ. याला बिल म्हणतात. वाच.'' डॉक्टर म्हणाले. दिनू तो कागद वाचू लागला.

| | रुपये - पैसे |
| --- | --- |
| रोग्याला तपासल्याबद्दल | १० = ०० |
| दोनदा घरी येण्याबद्दल | २० = ०० |
| आठ वेळा औषधाबद्दल | ८ = ०० |
| एकूण रुपये | ३८ = ०० |



दिनू ते बिल कितीतरी वेळ वाचत होता. तो एकदम मधेच हसला. त्याला काय वाटले कुणास ठाऊक. काहीतरी विचार त्याच्या डोक्यात आला.

घरी गेल्यावर दिनू आपल्या खोलीत गेला आणि कागदावर त्याने आपल्या आईच्या नावाने एक बिल तयार केले.

| आज बागेतून फुले आणल्याबद्दल | रुपये पैसे<br>०० =५० |
| --- | --- |
| बाळाला दोन तास सांभाळल्याबद्दल | २ =०० |
| शेजारच्या काकूंकडे निरोप घेऊन गेल्याबद्दल | १ =०० |
| दुकानातून साखर आणल्याबद्दल | ०० =५० |
| एकूण रुपये | ४ =०० |

ते बिल त्याने आईच्या खोलीत नेऊन ठेवले.

दुसऱ्या दिवशी दिनू सकाळी उठला. त्याच्या उशाशी चार रुपये ठेवलेले होते. दिनूने ते उचलले. तेवढ्यात तेथे ठेवलेला एक कागद त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्यावर काहीतरी लिहिलेले होते. त्याने कागद उचलला व चटकन वाचला. आईने दिनूच्या नावाने बिल केले होते.

| लहानपणापासून आतापर्यंत वाढवल्याबद्दल | रुपये-पैसे<br>काही नाही |
| --- | --- |
| यारदा आजारपणात दिवसरात्र जागून काळजी घेतल्याबद्दल | काही नाही |
| गोष्टी सांगून करमणूक केल्याबद्दल | काही नाही |
| वाचायला शिकवल्याबद्दल | काही नाही |
| एकूण | काही नाही |



दिनूच्या डोळ्यांत एकदम पाणी आले. त्याचा गळा भरून आला. त्याच्या हातातला कागद गळून पडला. ते पैसे घेऊन तो तसाच आईकडे धावत गेला.

काही न बोलता त्याने आईला पैसे परत केले व तो आईच्या मांडीवर डोके ठेवून रडू लागला.

आईने दिनूला कुरवाळले व त्याचा मुका घेत ती म्हणाली, ''तुझ्या बिलाचे पैसे पावले बरं दिनू!''

**दृष्टीस पडणे** – दिसणे. **गळा भरून येणे** – खूप वाईट वाटणे.

# ९. महात्मा फुले

आपल्या देशावर इंग्रजांचे राज्य होते. त्या वेळची ही गोष्ट.

एकदा इंग्रज राजपुत्राला लोकांनी पुण्याला बोलावले. राजपुत्राने येण्याचे कबूल केले. राजपुत्र पुण्याला येणार म्हणून सर्वांना आनंद झाला. दरबार भरवून राजपुत्राचे स्वागत करावे, असे त्यांनी ठरवले. पुण्यातल्या मोठमोठ्या लोकांना त्यांनी त्या स्वागत-समारंभासाठी बोलावले. जवळपासच्या श्रीमंत लोकांनाही आमंत्रण दिले. ते उंची उंची पोशाख करून आले. कोणी रंगीबेरंगी फेटे बांधले होते, तर कोणी झिरमिळ्यांच्या पगड्या घातल्या होत्या. काहीजण साहेबी वेशात आले. मंडपाच्या दारापाशी गर्दी झाली.

बाहेर शिपाई उभे होते. बंदोबस्त कडक होता. निमंत्रणपत्र पाहून शिपाई एकेकाला आत सोडत होते. साध्या वेशातला एक गरीब शेतकरी मंडपात जाऊ लागला. त्याचा पोशाख गरिबीचा होता. कमरेला आखूड धोतर, अंगात ठिगळे लावलेली बंडी, डोक्यावर फाटके मुंडासे आणि खांद्यावर घोंगडी असा त्याचा वेश होता. तो पाहून त्याला शिपायाने अडवले. त्याने

निमंत्रणपत्र पुढे केले. शिपायाने त्याला आत सोडले. तो तडक आत गेला. एका खुर्चीवर जाऊन बसला.

समारंभ सुरू झाला. राजपुत्राच्या स्वागताचे भाषण झाले. त्यानंतर अनेक भाषणे झाली. त्यांत राजपुत्राची तोंड भरून स्तुती होती. राजपुत्राचेही भाषण झाले. आता समारंभ संपणार, तेवढ्यात तो शेतकरी-वेशातला माणूस ताडकन उभा राहिला आणि मोठ्याने बोलू लागला, ''माझा हा असला पोशाख बघून तुम्हांला नवल वाटलं असेल. तुम्ही गोंधळात पडला असाल. मी ते ओळखलं आहे. पण माझा हाच पोशाख योग्य आहे. शेतकऱ्याचा तो खरा पोशाख आहे. माझा हा देश शेतकऱ्यांचा आहे. इथले शेतकरी शेतात वर्षभर राबतात, रात्रंदिवस कष्ट करतात, पण त्यांना पोटभर अन्न मिळत नाही. राहायला घर मिळत नाही. आपल्या त्या शेतकऱ्यांचं दुःख राजपुत्रांना कसं कळणार? दरबारातल्या या श्रीमंत लोकांकडे बघून त्यांना वाटेल, की हा देश श्रीमंत आहे. भरजरी पोशाखातल्या या माणसांना पाहून त्यांना वाटेल, की हा देश सुखात आहे; पण ते खरं नाही. या देशातले शेतकरी गरीब आहेत. ते हालात दिवस काढत आहेत. त्यांचं दुःख सगळ्यांना सांगावं, राजपुत्राला ते कळावं, म्हणून मी इथं शेतकऱ्याच्या वेशात आलो आहे. या



देशातल्या शेतकऱ्यांचं दुःख राजपुत्रांनी राणीसाहेबांच्या कानी घालावं.''

शेतकऱ्यांचे दुःख सर्वांच्या कानी घालणारा हा पुरुष म्हणजे थोर समाजसेवक महात्मा जोतीराव फुले!

********************************************************

**उंची पोशाख** — भारी किमतीचा पोशाख. **राबणे** — कष्ट करणे. **दिवस काढणे** — कष्टात जगणे. **कानी घालणे** — सांगणे. **महात्मा** — थोर पुरुष.

# १०. जयहिंद एक घोष

सगळ्या जगात सुंदर हा हिंद देश माझा
फुलपाखरे अम्ही हो, फुलबाग आमुचा हा ।।

येथे उभा हिमालय, शत्रूस धाक दावी
सुजला नद्या हजारो, सुफला ही मायभूमी ।।

महाराष्ट्र, आंध्र, गुर्जर, पंजाब, वंग, तामिळ,
आसाम, मध्य, उत्तर, काश्मीर, नाग, केरळ ।।

कर्नाटकादि येथे राज्ये जरी अनेक
हिंदीच सर्व आम्ही ना अन्य जात पंथ ।।

हिंदू इसाइ मुस्लिम एकत्र नांदताती
माळेत गुंफिलेली पुष्पे अनेक रंगी ।।

येथे न धर्म शिकवी शत्रुत्व आपसांत
भाषा अनेक अमुच्या जयहिंद एक घोष ।।

[आधार — सारे जहाँ से अच्छा]



# ११. चतुर चिमणी

एक होती चिमणी. तिला सापडला फुटाणा. तो चोचीत घेऊन ती उडायला लागली. फुटाणा चोचीतून पडला. लाकडाच्या फटीत अडकला. काही केल्या निघेना. तिला दिसला सुतार. ती त्याला म्हणाली, ''सुतारदादा, लाकूड काप. फटीतून फुटाणा काढ.''

''मला नाही वेळ,'' सुतार म्हणाला आणि निघून गेला. मग दिसला शिपाई. ती शिपायाला म्हणाली, ''शिपाईदादा, सुताराला शिक्षा कर. तो फुटाणा काढून देत नाही.''



शिपाई म्हणाला, ''मला नाही वेळ.''

चिमणी म्हणाली, ''लोकांना मदत करणं हे तुझं कामच आहे; पण त्यालाच वेळ नाही म्हणतोस?''

शिपाई निघून गेला. मग तिला दिसला फौजदार.

चिमणी म्हणाली, ''फौजदारदादा, शिपायाला शिक्षा कर. तो मला मदत करत नाही.''

फौजदार म्हणाला, ''मला नाही वेळ.''

इतक्यात हत्तीवर बसून राजा आला. चिमणी त्याला म्हणाली, ''राजा राजा, फौजदाराला शिक्षा कर. तो फुटाणा काढायला मदत करत नाही. मी उपाशी आहे.''



राजाने चिमणीच्या बोलण्याकडे लक्षच दिले नाही. पण तिचे बोलणे एका मुंगीने ऐकले. मुंगी म्हणाली, ''चिऊताई, काय ग झालंय? तू उपाशी का आहेस?''

चिमणी म्हणाली, ''फुटाणा पडला लाकडाच्या फटीत. सुतार काढून देत नाही. शिपाई आणि फौजदार मदत करत नाहीत. राजा तर माझ्याकडे लक्षही देत नाही.''

मुंगी म्हणाली, ''असं होय? थांब, मी तुझं काम करते.''

मुंगी हत्तीच्या कानाजवळ गेली आणि हळूच म्हणाली, ''चिमणीच्या बोलण्याकडे लक्ष दे, असं राजाला सांग.''

हत्ती म्हणाला, ''मी नाही सांगणार जा!''

मुंगी म्हणाली, ''मग मी तुझ्या कानात जाईन, कडकडून चावा घेईन.''

हत्ती घाबरून म्हणाला, ''नको नको मुंगीताई, कानात जाऊ नकोस. चावा घेऊ नकोस. मी मरेन. मी राजाला सांगतो. मग तो चिमणीच्या बोलण्याकडे लक्ष देईल.''

हत्ती राजाला म्हणाला, ''राजा चिमणीच्या बोलण्याकडे लक्ष दे. नाहीतर मी जमिनीवर लोळेन.''
राजा घाबरला, ''नको नको, मी खाली पडेन. मी

चिमणीचं ऐकतो.'' राजा चिमणीला म्हणाला, ''काय ग झालं चिऊताई?''

चिमणी म्हणाली, ''माझा फुटाणा लाकडाच्या फटीत पडला. सुतार काढून देईना. शिपाई त्याला शिक्षा करीना. फौजदार लक्ष घालीना. त्यांना वेळच नाही. राजा, मी तर उपाशी आहे.''

राजाने फौजदाराला बोलावले आणि शिपायाला शिक्षा कर, असा हुकूम दिला.

फौजदार शिपायाला शिक्षा करायला निघाला. शिपाई धावत सुताराकडे गेला. त्याला म्हणाला, ''चिऊताईचा फुटाणा लाकडाच्या फटीतून काढ; नाहीतर तुला शिक्षा करीन.''

सुतार घाबरला. त्याने लाकूड कापले. फुटाणा बाहेर काढला. चिमणीला दिला. चिमणीने तो चोचीत घेतला. अर्धा फोडून मुंगीला दिला आणि चिमणी भुर्रकन् उडून गेली.



# १२. मुक्तागिरी

मुक्तागिरी हे एक रमणीय ठिकांण आहे. ते अमरावतीपासून सुमारे साठ किलोमीटर अंतरावर आहे.



चारही बाजूंनी उंच उंच पर्वतांच्या रांगा. दाट सावली देणारी मोठमोठी झाडे. हिरव्यागार वेली. रंगीबेरंगी फुले. जवळच नागासारखी वळणे घेत वाहणारी नाग नावाची नदी. तिचे उंचावरून कोसळणारे धबधबे, त्यांचे अंगावर उडणारे थंडगार पाण्याचे तुषार. फेसासारखे पाणी व त्याचा दुधासारखा रंग, हे सगळे पाहून मन प्रसन्न होते. पायवाट झाडाझुडपांतून लपत छपत जाते.

डोंगरावर बांधलेल्या पायऱ्या उंच उंच जातात. वाटेत अनेक देवळे दिसतात. काही वाटा भुयारातून लेण्यांकडे जातात. हे सगळे दृश्य मनाला आनंदित करते.

गुंफा, लेणी आणि देवळे जैनांनी बांधली आहेत. पार्श्वनाथ हे जैनांचे धर्मगुरू. त्यांना तीर्थंकर म्हणतात. त्यांच्या मूर्ती देवळात आणि लेण्यांत सर्वत्र दिसतात. त्या काळ्याआणि पांढऱ्या दगडांतून कोरलेल्या आहेत. सुंदर, रेखीव आणि उंच अशा त्या मूर्ती पाहून मन चकित होते. एवढ्या उंचीवर कोरलेली लेणी सुरेख



आहेत. त्यांतील कारागिरीचे कौशल्य पाहून डोळ्यांचे पारणे फिटते. मुक्तागिरी हे जैनांचे एक मोठे तीर्थक्षेत्र आहे.

नाग नदीच्या पात्रात मोठमोठे दगड आहेत. त्यांचे आकार मजेदार आहेत. दुरून ते निरनिराळ्या प्राण्यांसारखे दिसतात. कुणाला ते हत्तीसारखे दिसतात, कुणाला हरणासारखे तर काहींना ते वाघासारखे वाटतात.

नदीचे पाणी स्वच्छ आहे. तळाशी पडलेली सुईदेखील स्पष्ट दिसते. लहान लहान मासे गर्दी करून पोहत असतात. त्यांच्या चपळ हालचालींमुळे करमणूक होते.

डोंगराच्या पायथ्याशी मुक्तागिरी नावाचे छोटेसे गाव आहे. तेथील लोक स्वभावाने प्रेमळ आहेत. यात्रेकरूंचे आणि प्रवाशांचे ते मनापासून स्वागत करतात. येथे साधे, स्वच्छ जेवण मिळते. नदीच्या वाळवंटात उभारलेल्या झोपड्यांतून राहण्याची मौज येते. यात्रेच्या दिवसांत तो परिसर गजबजून जातो. सर्व धर्मांचे व पंथांचे लोक या यात्रेला जातात. कुठलाही भेदभाव तेथे दिसत नाही. सगळ्या भेदभावांपासून हा गिरी लोकांना मुक्त ठेवतो. 'मुक्तागिरी' हे नाव त्याला शोभून दिसते.

**गिरी** — पर्वत. **रमणीय** — सुंदर. **तुषार** — पाण्याचे बारीक थेंब. **पारणे फिटणे** — समाधान होणे. **मुक्त** — मोकळा.



# १३. मला वाटते



मला वाटते बसुनी विमानि
अफाट गगनी हिंडावे
किंवा सुंदर नौकेमधुनी
समुद्रातुनी भटकावे!



निळा निळा तो समोर डोंगर
चढुनी त्यावर पाहावे
राज्य पऱ्यांचे, जाऊन तेथे
राजपदाते मिळवावे!

परि भूमीवर संध्याकाळी!
छाया काळी जो धावे
तेव्हा वाटे सोडुनि सकलां
निज मातेला बिलगावे!

**नौका** — नाव. **राजपद** — राज्य. **सकल** — सगळे.
**परि** — परंतु. **छाया** — सावली. **निज माता** — आपली आई.



# १४. अजाबराव

अजाबराव सकाळी उठले. बाहेरच्या ओटीवर आले आणि तळपायाला पट्ट्या बांधू लागले. बांधताना 'आई ग, आई ग,' म्हणून जोरजोराने कण्हू लागले.

त्यांचा नोकर झाडांना पाणी घालत होता. मालक सकाळी उठून तळपायाला पट्ट्या बांधत आहेत, हे त्याने पाहिले. तो त्यांच्याकडे गेला आणि म्हणाला, "तळपायाला पट्ट्या का बांधता? काय झालं तळपायाला?" अजाबरावांनी चेहरा खूपच गंभीर केला. नोकर अधिकच घाबरला. काहीतरी भयंकर लागले असावे, असे त्याला वाटले. तो मालकाच्या पायाकडे पुनःपुन्हा बारकाईने पाहू लागला. पण कुठेही काही खरचटलेलेदेखील दिसेना. कुठे एवढेही रक्त दिसेना.

नोकराने पुन्हा विचारले, "मालक, असं काय लागलं हो?"

अजाबराव रडका सूर काढून म्हणाले, "तू मला हसशील. मला वेडा म्हणशील."

"नाही नाही. मी तुमचा नोकर. मी तुम्हांला कसा वेडा म्हणेन? मला तुमच्याइतका शहाणा दुसरा कुणी कधी आढळलाच नाही. सांगा, काय लागलं पायाला?"



अजाबरावांच्या डोळ्यांत पाणी आले. हाताने खिळ्याचा आकार दाखवत ते म्हणाले, ''माझ्या पायात एवढा मोठा खिळा रुतला रे!''

''एवढा मोठा खिळा? बाप रे! पण तो केव्हा रुतला?''

''रात्री!''

''रात्री? रात्री कुठं गेला होतात तुम्ही?''

''कुठंच नाही रे. झोपलो होतो.''

''मग एवढा मोठा खिळा कुठं रुतला?''

''स्वप्नात!''

नोकराला आश्चर्य वाटले. स्वप्नात खिळा रुतला म्हणून काय सकाळी उठून पायाला पट्टी बांधायची? हा वेडेपणा आहे.

तरीपण नोकर मालकापेक्षाही अधिक कळवळला. गळा काढून रडायला लागला आणि म्हणाला, ''मालक तुम्ही आमचं कधीही ऐकत नाही, त्याचा परिणाम असा झाला. माझं ऐकलं असतं तर स्वप्नात खिळा रुतलाच नसता.''

''तू काय सांगितलं होतंस मला?''

''झोपताना पायांत जोडे घालत जा म्हणून.''

*********************************************************

**गळा काढून रडणे** — मोठमोठ्याने रडणे.

## १५. ताराबाईची सर्कस

जुनी गोष्ट आहे. एका गावात कार्लेकर सर्कसचे खेळ सुरू होते. वाघाचा खेळ पिंजऱ्यात दाखवत. तो पाहायला लोक गर्दी करत.

आता वाघाचा खेळ सुरू झाला. वाघ रिंगणात आला. सोळा वर्षांची एक मुलगी धीटपणे पिंजऱ्यात उभी होती. तिने त्या वाघाला चाबूक मारला. वाघ तिच्याकडे वळला. जोराने ओरडला. लोक घाबरले. ते जागेवरच खिळून बसले. वाघ रागाने गुरगुर करत स्टुलावर चढून बसला. त्या मुलीने पुन्हा चाबकाचा फटकारा दिला. वाघ चिडला. त्याने आ वासला. भयानक डरकाळी फोडली. त्याचा मोठा जबडा दिसला. लाल लाल जीभ बाहेर आली. समोरचे टोकदार दात चमकले. लोक भयभीत झाले.

तेवढ्यात त्या मुलीने आपली मान वाघाच्या त्या जबड्यात दिली. लोक श्वास रोखून पाहू लागले. आता वाघ तिला खाणार! लोकांना घाम फुटला. लहान मुले रडायला लागली. अनेकांनी भिऊन डोळे गच्च मिटले, पण क्षणातच त्या मुलीने आपली मान बाहेर काढली. लोकांनी टाळ्यांचा कडकडाट केला. त्या मुलीने गोड हसून लोकांना अभिवादन केले.



त्या मुलीचे नाव ताराबाई होते. तिच्या वडिलांचे नाव गुलाबराव शिंदे होते. त्यांनी तिला व्यायामाचे धडे दिले. ती रोज दूध व सकस आहार घेई, त्यामुळे तिचे शरीर मजबूत बनले. तिच्या अंगात वाघाचे बळ आले.

सर्कशीत ती आपल्या शक्तीचे प्रयोग करी. माणसांनी भरलेली गाडी आपल्या केसांनी ओढी. चालती मोटार हाताने धरून थांबवी. आपल्या छातीवर हत्ती उभा करी. छातीवर दगड ठेवी. तो दगड घणाचे घाव घालून छातीवरच फोडला जाई. ताराबाईचे हे शक्तीचे खेळ पाहून लोक तोंडात बोटे घालत.



ताराबाईचे नाव सगळ्या भारतात झाले. पुढे तिने स्वत:चीच सर्कस काढली. तिला 'ताराबाई सर्कस' असे नाव दिले. ताराबाईची ही सर्कस भारतभर गाजली.

**रिंगण** — वर्तुळाकार जागा. **जागेवर खिळणे** — एका जागी बसणे. **श्वास रोखून पाहणे** — भीतीने एकटक पाहणे. **अभिवादन करणे** — नमस्कार करणे. **तोंडात बोट घालणे** — आश्चर्यचकित होणे.

# १६. झोका



झुई झुई झोका
झाडावर टांगा,
झोक्यासाठी लावा
भराभरा रांगा.

गूळ खोबरं पेढा
आणा कुणी शेंगा,
आळी पाळी बसू
नका करू दंगा.

वर खाली वर
झोका आला वेगा,
पोटामधि माझ्या
गुईं गुईं गुंगा.

उंच गेला झोका
दादा झाला ठेंगा,
ताईला वाकुल्या
डिंग डिंग डिंगा.

गार गार हवा
शहारते अंगा
मजा आली किती
वारा घाली पिंगा

आई देते झोका
खेळ आला रंगा
सुख मोठे कुठे
याच्याहुनि सांगा!

ठेंगा – ठेंगणा.
शहारणे – अंगावर काटा येणे.
पिंगा घालणे – भोवताली फिरणे.



# १७. बैल झपाटला

खंडू पाटलांचे बैल खिलारी जातीचे होते. ते त्यांना प्रेमाने सरदार आणि दिलदार म्हणत. ते बैलांची उत्तम निगा राखत. त्यामुळे बैल नेहमी धष्टपुष्ट आणि जोमदार असत.

खंडू पाटलांनी चाबकाचा खुळखुळा वाजवला, की बैलांना इशारा मिळे. गाडीत कितीही ओझे असले तरी ते गाडी भिंगरीसारखी पळवत.

एके दिवशी पाटलांची गाडी शेतातून दौडत येत होती. गाडीत धान्याची पोती होती. वेशीजवळ गाडी येताच सरदार एकदम उभा राहिला आणि मटकन खाली बसला.

झाले, खंडू पाटलांच्या तोंडचे पाणी पळाले. त्यांनी गाडीतून खाली उडी मारली. मूठभर माती घेऊन बैलावरून ओवाळून टाकली. त्याच्या पाठीवर थाप मारली. 'सरदार, सरदार' म्हणून शेपटीला हात घातला, पण सरदार काही उठेना.

खंडू पाटलांचा बैल पळता पळता एकदम बसला, ही बातमी हा हा म्हणता गावभर पसरली. माणसांची तेथे गर्दी जमली.

कोणी म्हणे, 'बैल दृष्टावला.'

कोणी म्हणे, 'भर दुपारची वेळ. बैल झपाटला.'

पाटलीण धावतच वेशीत आली. बैलाला पाहून ती झटकन शेजारच्या घरात गेली. बचकभर मिरच्या, चिमूटभर मीठ, काळा काळा बिब्बा लगबगीने घेऊन आली. तिने बैलांची दृष्ट काढली. राखेची चिमूट घेऊन खंडोबाच्या नावाने अंगारा लावला, पण सरदार काही उठेना. कसेबसे करून लोकांनी त्याला घरी आणले.

एक दिवस झाला. दोन दिवस झाले. बैल उभा राहीना. काही खाईना-पिईना. अनेक उपाय केले. मांत्रिकांचेही उपचार झाले, पण गुण आला नाही. पाटलांचा चेहरा काळजीने काळवंडून गेला. त्यांना काही सुचेनासे झाले.

तालुक्याला गुरांचा दवाखाना होता. दवाखान्याचे डॉक्टर हुशार होते. ते शेतकऱ्यांत मिळून मिसळून वागत असत. त्यांना खंडू पाटलांच्या बैलाची हकीकत समजली. ते बैलाला पाहण्याकरता पाटलांच्या घरी गेले. त्यांच्याबरोबर लोकांचा घोळका होताच.

डॉक्टरांनी बैलाच्या पायाचे खूर लक्षपूर्वक पाहिले. त्यांनी जमलेल्या मंडळींना विचारले, ''बैलाला काय झालं असावं?''



बहुतेकांनी सांगितले, 'बैल झपाटला.'

डॉक्टर हसले. त्यांनी बैलाचा दुखावलेला पाय पकडून ठेवण्यास सांगितले. आपल्या पेटीतून काही हत्यारे काढली. बैलाच्या पायात रुतलेला एक बारीकसा खिळा त्यांनी चटकन उपसून काढला. खिळा निघताच बैल पाय झाडत झटकन उभा राहिला. लोक डॉक्टरांकडे टकमका पाहू लागले.

खंडू पाटलांना व त्यांच्या बायकोला अतिशय आनंद झाला.

---

**झपाटणे** — बाधा होणे. **निगा राखणे** — काळजी घेणे. **धष्टपुष्ट** — गुबगुबीत. **तोंडचे पाणी पळणे** — खूप घाबरणे. **दृष्टावणे** — नजर लागणे. **बचकभर** — मूठभर. **चेहरा काळवंडणे** — चेहरा उदास होणे. **टकमका पाहणे** — एकसारखे पाहणे.

# १८. एक धरण

नदी जीवनाला अतिशय उपयोगी असते. नदीमुळे पिण्याच्या पाण्याची सोय होते. शेती भरपूर पिकते. नदी शेवटी समुद्राला मिळते. तिचे पुष्कळसे पाणी समुद्रात वाहून जाते. ते उपयोगात यावे म्हणून नदीचे पाणी अडवतात. तिच्या पात्रात एक भिंत बांधतात. ती भिंत मातीची, दगडाची किंवा सिमेंटची असते. ही भिंत पाण्याला धरून ठेवते, म्हणून तिला धरण म्हणतात.

आपल्या महाराष्ट्रात असे एक धरण गोदावरी नदीवर बांधलेले आहे. गोदावरी ही एक मोठी नदी आहे. तिला दक्षिणगंगा असे म्हणतात. ती नाशिक जिल्ह्यात त्र्यंबकेश्वर येथे उगम पावते व मराठवाड्यातून पूर्वेकडे वाहत जाते.





पैठणजवळ गोदावरीचे पाणी धरण बांधून अडवले आहे. या धरणाची भिंत उंच व रुंद आहे. त्यावरून मोठमोठी वाहनेदेखील जातात. ही भिंत दहा किलोमीटर लांबीची आहे.

या धरणामुळे पैठणजवळ एक मोठा तलाव तयार झाला आहे. संत एकनाथांची आठवण म्हणून त्याला 'नाथसागर' असे नाव दिले आहे. नाथसागरजवळ एक मोठे उद्यान तयार केले आहे. त्यात वेगवेगळ्या प्रकारची मोठमोठाली. झाडे आहेत. त्यांची सावली दाट पडते. त्यांत पिंपळाची झाडे खूप आहेत. नाना रंगांच्या फुलांचीही झाडे आहेत. तेथे अनेक प्रकारचे पक्षी राहतात. या उद्यानाला 'ज्ञानेश्वर उद्यान' असे म्हणतात. संत ज्ञानेश्वरांना पैठणलाच नावलौकिक मिळाला.

आधी जायकवाडी नावाच्या खेड्याजवळ हे धरण बांधणार होते, म्हणून त्याचे नाव 'जायकवाडी धरण' असे ठेवले. 'जायकवाडी धरण' हे महाराष्ट्रातील एक सर्वांत मोठे धरण आहे.

*******************************************************

**जीवनाला** — जगण्यासाठी. **उद्यान** — बगीचा.
**नाना रंग** — अनेक रंग. **नावलौकिक** — मोठेपणा.



## १९. नसती उठाठेव

मोठे होते झाड वाकडे
तिथे खेळती दोन माकडे
गंमत झाली भारी, बाबा
गंमत झाली भारी ।।

खर खर खर खर सुतारकाका
कापित होते एक ओंडका
भुर् भुर् भुर् भुर् भुसा उडाला
माकड मज्जा पाहू लागला
निम्मे लाकूड चिरून झाले
दुपार होता काम थांबले
पाचर ठोकून सुतार गेले
खावयास भाकरी ।।

माकड टुणकन् खाली आले
पाचर हलवुनि काढू लागले
शहाणे दुसरे त्यास बोलले,
"धोक्याचे हे काम न अपुले"
पहिले अपुला हट्ट न सोडी
जोर लावूनी पाचर काढी
फटीत अडके शेपूट तेव्हा
माकड हाका मारी ।।



सुतार येता दुसरे माकड
झाडावरती चढले भरभर
अतिशहाणे माकड वेडे
उदासवाणे बसुन ओरडे
उठाठेव ही नसती सारी
सुतार त्याला फटके मारी
म्हणून करावा विचार आधी
नंतर कामे सारी ।।



# २०. राणीची झोप

एक होता राजा  त्याच्या राणीला झोप येत नसे. परांची गादी दिली तरीही तिची तक्रार असेच.

राजाने प्रधानाला बोलावले आणि विचारले, ''परांची गादी असूनही झोप येत नसेल तर काय करावं?''

प्रधान म्हणाला, ''महाराज, मी एक उपाय सुचवतो.''

''कोणता?'' राजाने अधीरतेने विचारले.

प्रधान म्हणाला, ''महाराज, गादीवर फुलं अंथरावीत. आपल्या बागेत जाईजुईची खूप फुलं आहेत. फुलांच्या कळ्या संध्याकाळी खुडायच्या आणि गादीवर अंथरायच्या. रात्री त्या कळ्या फुलतील. शांत झोप येईल.''

राणी फुलांच्या गादीवर झोपू लागली. तरी तिला शांत झोप येईना. ती राजाला म्हणाली, ''माझ्या पाठीला रात्रभर काहीतरी टोचत होतं.''

राजाने बिछाना पाहिला. त्यावर जाईजुईच्या सुकलेल्या फुलांखेरीज दुसरे काहीही नव्हते. तेव्हा राजाने विचारले, ''तुला काय टोचत होतं?''

सुकलेल्या फुलांतून न उमललेली एक कळी राणीने उचलली आणि म्हणाली, ''पाहिलीत ही न उमललेली कळी? ही टोचल्याशिवाय कशी राहील? यापुढं मी इथं राहणार नाही,'' असे म्हणून तिने माहेरी जाण्याचा हट्टच धरला.

राजाचा नाइलाज झाला. त्याने राणीच्या प्रवासासाठी खास जहाज दिले.

प्रवास सुरू झाला. एक दिवस अचानक वादळ आले. वादळात जहाज फुटले. पण राणीला एका ओंडक्याचा आधार मिळाला. ती किनाऱ्याला लागली.

तिला तेथे कोणीच ओळखत नव्हते. भुकेने,. तहानेने राणी व्याकूळ झाली. एका म्हातारीला तिची दया आली. तिने तिला घरी नेले. खाऊपिऊ घातले.

म्हातारी धरणावर मोलमजुरी करत होती. राणीदेखील तिच्याबरोबर धरणावर काम करू लागली. दिवसभर कष्ट केल्यामुळे रात्री चटईवरही तिला शांत झोप येऊ लागली.

एक दिवस धरणाचे काम पाहायला त्या देशाचा राजा आला. राणी तेथे काम करत होती. तिचा वेश बदलला होता, तरी त्या राजाने तिला ओळखले. तो राजा तिचा भाऊच होता. त्याने तिला घरी नेले.



काही दिवस माहेरी राहून राणी सासरी आली. आता तिची झोपेची तक्रार राहिली नव्हती. ते पाहून राजाला समाधान वाटले.

तो गमतीने म्हणाला, ''तुला कळी टोचत होती ना?''

राणी चटकन म्हणाली, ''मला कळी टोचत नव्हती. टोचत होता माझा आळशीपणा!''

---

**परांची —** पिसांची. **मोलमजुरी —** पैसे घेऊन केलेले काम.

# २१. सोन्याची कुऱ्हाड

एक लाकूडतोड्या होता. तो जंगलात जाई. लाकडे तोडून आणी. ती विकून कसेबसे पोट भरी.

त्याचे आजोबादेखील लाकूडतोड्याच होते. एकदा ते जंगलात लाकडे तोडत होते. त्यांची कुऱ्हाड बाजूच्या तलावात पडली. ते काठावर बसून रडू लागले. त्यांचे रडणे ऐकून देवदूत आला. त्याने तळ्यात उडी मारून एक सोन्याची कुऱ्हाड वर काढली आणि आजोबांना म्हणाला, ''ही घे तुझी कुऱ्हाड.''



आजोबा म्हणाले, ''माझी कुऱ्हाड सोन्याची नव्हती.''

देवदूताने पुन्हा तलावात उडी मारली आणि चांदीची कुऱ्हाड वर काढली. आपली नाही म्हणून आजोबांनी ती कुऱ्हाडसुद्धा घेतली नाही. मग देवदूताने आजोबांची मूळ लोखंडी कुऱ्हाड वर काढली.

''हीच ती माझी कुऱ्हाड,'' म्हणून आजोबांनी ती घेतली. देवदूताने आजोबांचा प्रामाणिकपणा पाहून सोन्याची व चांदीचीही कुऱ्हाड त्यांना बक्षीस दिली.

आजोबांची ही गोष्ट कळताच लाकूडतोड्याच्या तोंडाला पाणी सुटले. त्याच्या मनात आले, देवदूताकडून सोन्याची कुऱ्हाड मिळवावी. त्याने आपली लोखंडाची कुऱ्हाड तलावात फेकून दिली आणि काठावर बसून रडू लागला. देवदूत आला. त्या आजोबांचाच हा नातू आहे, हे त्याने ओळखले. हाही तसाच प्रामाणिक असणार. सोन्याची व चांदीची कुऱ्हाड काढत बसण्यात कशाला वेळ घालवायचा? असा विचार करून त्याने लोखंडी कुऱ्हाडच तलावातून वर काढली.

लाकूडतोड्या खट्टू झाला. त्याला हवी होती सोन्याची कुऱ्हाड. तो देवदूताला म्हणाला, ''ही कुऱ्हाड

माझी नाही. आज लाकडं तोडायला मी आजोबांची सोन्याची कुऱ्हाड आणली होती.''

देवदूत मनात हसला. लाकूडतोड्याचा खोटेपणा त्याने ओळखला. तरीही तलावात उडी मारून त्याने सोन्याची कुऱ्हाड वर काढली. लाकूडतोड्याने ती देवदूताच्या हातून ओढून घेतली आणि घराकडे पळत सुटला.

बाजूच्या झाडामागे दोन चोर दडून बसले होते. त्यांनी लाकूडतोड्याला सोन्याची कुऱ्हाड घेऊन पळताना पाहिले. त्यांनी लगेच त्याला अडवले आणि त्याची सोन्याची कुऱ्हाड हिसकावून घेतली. चांगला मार दिला आणि जवळच्या काटेरी झुडपात त्याला फेकून दिले.

लाकूडतोड्याला खूप काटे रुतले. त्याचे अंग रक्तबंबाळ झाले. सोन्याची कुऱ्हाड तर गेलीच, पण मूळ लोखंडाचीही कुऱ्हाड परत मिळाली नाही. तो काळजीत पडला. आता लाकडे तोडायची कशाने? पोट भरायचे कसे? तो पुन्हा तलावाच्या काठी गेला. तलाव खूप खोल होता. त्यात उडी मारण्याची हिंमत होत नव्हती. पूर्वी कोणीतरी उडी मारली आणि तो वर आलाच नाही, हे त्याला ठाऊक होते. आता आपल्याला उपाशीच राहावे लागणार, म्हणून लाकूडतोड्या रडू



लागला. 'मी हावरटपणा केला. सोन्याची कुऱ्हाड मिळवावी म्हणून देवदूताशी खोटे बोललो.' याचे त्याला आता वाईट वाटू लागले. तो मनात देवदूताचा धावा करू लागला. आणि म्हणाला, ''यापुढं मी हावरटपणा करणार नाही. खोटं कधी बोलणार नाही.''

देवदूत आला. त्याने तलावात उडी मारून लोखंडी कुऱ्हाड वर काढली आणि म्हणाला, ''या कुऱ्हाडीनं फक्त वाळलेली लाकडं तोड. झाडं तोडू नकोस. जंगलाचं रक्षण कर.''

लाकूडतोड्याने नमस्कार केला आणि तो आनंदाने घरी परतला.

**तोंडाला पाणी सुटणे** — हाव सुटणे. **खट्टू होणे** — निराश होणे.



## २२. रोपटे

सोनुल्या रोपुल्या सानुल्या छकुल्या
येरे मित्रा रहायला अंगणात आपुल्या

पाणी मी घालीन गाणी मी गाईन
भराभरा वाढशील भिडशील आभाळा

येतील पाखरे गातील लेकरे
आजोबांच्या रंगतील गोष्टी मोठमोठाल्या
पानांत हसतील चंद्रसूर्य शीतल
संध्याकाळी शोभतील चांदण्यांच्या टिकल्या

तुझ्या रे फांदीला बांधून हिंदोळा
तुझी माझी दोस्ती सांगू जगाला सगळ्या

येरे मित्रा रहायला अंगणात आपुल्या!

**रोपुल्या** — छोट्या रोपा. **आभाळाला भिडणे** — उंच वाढणे.
**शीतल** — थंड. **हिंदोळा** — झोका.

# २३. शिष्यांची परीक्षा

ही महाभारतातली कथा आहे.

कौरव आणि पांडव यांना द्रोणाचार्य धनुर्विद्या शिकवत होते.

एकदा त्यांनी शिष्यांची परीक्षा घ्यायचे ठरवले. त्यासाठी एक मातीचा पक्षी आणला. तो झाडावर टांगला. सर्व शिष्यांना एकत्र जमवले. ते म्हणाले, ''मुलांनो! या पक्ष्याचं डोकं कोण उडवू शकेल, ते पाहू.''

पहिली पाळी युधिष्ठिराची होती.

द्रोणाचार्य त्याला म्हणाले, ''धनुष्याला बाण लाव. पक्ष्यावर नेम धर आणि मी सांगेन तेव्हा बाण सोड.''

युधिष्ठिराने बाण लावला. नेम धरला. द्रोणाचार्यांनी त्याला विचारले, ''आता तुला काय दिसतं? मी दिसतो का? झाड दिसतं का? पक्षी दिसतो का?''

युधिष्ठिर म्हणाला, ''होय. मला तुम्ही दिसता. झाड दिसतं व पक्षीही दिसतो.''

त्यावर द्रोणाचार्य म्हणाले, ''तू बाण सोडू नकोस. बाजूला हो.''

नंतर दुर्योधन आला.

त्यालाही द्रोणाचार्यांनी बाण लावायला सांगितले. पक्ष्यावर नेम धरायला लावला आणि विचारले, ''तुला काय काय दिसतं? मी दिसतो का? झाड दिसतं का? पक्षी दिसतो का?''

दुर्योधन म्हणाला, ''होय. मला सगळं दिसतं.''

द्रोणाचार्यांनी त्यालाही बाजूला केले.

अशाच प्रकारे द्रोणाचार्यांनी एकेका शिष्याला बोलावले. पक्ष्यावर नेम धरायला सांगितले आणि आता काय काय दिसते,ते विचारले.

सगळ्यांनी एकसारखेच उत्तर दिले, ''तुम्ही दिसता. झाड दिसतं. पक्षी दिसतो.'' या सर्वांना द्रोणाचार्यांनी बाण सोडायला सांगितले नाही. त्यांना बाजूला केले.

शेवटी अर्जुनाची पाळी आली. त्यालाही द्रोणाचार्यांनी पक्ष्यावर नेम धरायला सांगितले आणि विचारले, ''आता तुला काय काय दिसतं? मी दिसतो? झाड दिसतं? पक्षी दिसतो?''

अर्जुन म्हणाला, ''नाही. मला तुम्ही दिसत नाही. झाड दिसत नाही. फक्त पक्ष्याचं डोकं दिसतं.''

द्रोणाचार्यांना ते उत्तर ऐकून आनंद झाला. त्यांनी अर्जुनाला बाण सोडायला सांगितले. अर्जुनाने बाण सोडला. बाणाने पक्ष्याचे डोके उडवले.



नेमबाजीत मनाची एकाग्रता पाहिजे. जिथे नेम धरला असेल तिथेच फक्त लक्ष पाहिजे. मगच यश मिळते. अर्जुन म्हणूनच यशस्वी झाला. आणि द्रोणाचार्यांचा आवडता शिष्य बनला.

**धनुर्विद्या** — धनुष्य वापरण्याची विद्या. **नेमबाजी** — नेम धरण्याची कला. **एकाग्रता** — मन एकाच ठिकाणी लावणे.

# २४. पवनचक्की

(एक स्त्री आणि तिचा मुलगा येत आहेत. मुलाच्या हातात रंगीत कागदाचे भिरभिरे आहे. ते गरगर फिरत आहे. मागोमाग गुरुजी व त्यांची मुलगी यमू येतात.)



**यमू :** [त्या भिरभिऱ्याकडे पाहत] **बाबा, ते भिरभिरं किती छान फिरतंय हो!**

**गुरुजी :** **हो ना.**

**यमू :** **कशामुळं फिरतंय हो?**

**गुरुजी :** **वाऱ्यामुळं.**

**यमू :** [आश्चर्याने] **वाऱ्यामुळं?**

**गुरुजी :** **हो. वाऱ्यात शक्ती असते. माणसानं तिचा खूप उपयोग करून घेतला आहे.**

**यमू :** **कुठं हो?**

**गुरुजी :** **तू शिडाचं जहाज पाहिलंस ना?**

**यमू :** **हो.**

**गुरुजी :** **त्याच्या शिडात वारा भरला की ते जहाज पुढं जातं.**

यमू : म्हणजे जहाजाला वेग मिळतो तो वाऱ्यामुळं?

गुरुजी : बरोबर. म्हणूनच मी म्हणालो, की वाऱ्यात शक्ती आहे.

यमू : बाबा, आणखी कुठं दिसते हो ही शक्ती?

गुरुजी : पवनचक्कीत.

यमू : पवनचक्की? पवनचक्की म्हणजे काय हो?

गुरुजी : [बोटाने दूर दाखवत] ते उंचावर चाकासारखं फिरतंय ना, त्याला पवनचक्की म्हणतात.

यमू : तिथं तर त्या चाकाला पाती दिसतात.

गुरुजी : हो. त्या पात्यांनाच तर वारा गती देतो आणि ती चक्की फिरते.

यमू : या पवनचक्कीचा काय उपयोग होतो?

गुरुजी : विहिरीतलं पाणी बाहेर काढतात.

यमू : विहिरीतलं पाणी तर पंपानं बाहेर काढतात.

गुरुजी : हो, पण त्या पंपालाही चालवणारी एक शक्ती असतेच. आपण तिला वीज म्हणतो. हो की नाही?

यमू : हो.

गुरुजी : इथंही पवनचक्की वीज निर्माण करते आणि ती पंपासाठी वापरतात.

यमू : म्हणजे वारा गड्याचं काम करतो. पाणी काढतो.

गुरुजी : छे छे! गड्याचं नाही हं, सवंगड्याचं! मित्रासारखाच उपयोगी पडतो तो आपल्या.

यमू : हे मात्र खरं आहे. पण बाबा, पवनचक्कीचा आणखी काय उपयोग होतो हो?

गुरुजी : अग, पवनचक्कीमुळं एकदा वीज निर्माण झाली, की खेडेगावात चक्की चालते. रस्त्यावरचे दिवे लागतात.

यमू : म्हणजे पवनचक्की ही एक वीज निर्माण करणारं यंत्रच झालं.

गुरुजी : हो ना.

यमू : बाबा, ती पवनचक्की आपण जवळ जाऊन पाहूया.

गुरुजी : बरं, तर चल. (दोघेही जातात.)



# २५. बदके

नदीच्या काठाशी इवल्या पाण्यात
बदके फिरती आनंदे पोहत ॥ १ ॥

पांढरी गोजिरी फुलती तगरी
पांढरी बदके शोभती त्यापरी ॥ २ ॥

चाफ्याची की कळी चोच ही कोवळी
नखे ही पिवळी पाण्यात शोभली ॥ ३ ॥

पांढरी पिवळी बदके पोहती
पाण्याची वर्तुळे मागून धावती ॥ ४ ॥



# २६. बापू

आपला भारत देश स्वतंत्र झाला. महात्मा गांधींच्या प्रयत्नांना यश आले. महात्मा गांधींचे पूर्ण नाव मोहनदास करमचंद गांधी.



ते शिकून वकील झाले. एकदा वकिलीच्या कामासाठी ते दक्षिण आफ्रिकेत गेले. तिथे गोऱ्या इंग्रजांचे राज्य होते. आफ्रिकेतील मूळ लोक रंगाने काळे होते. काळे म्हणून इंग्रज त्यांना वाईट वागवत. त्यांना आपल्यात मिसळू देत नसत. आगगाडीत त्यांच्यासाठी वेगळे डबे असत.

एकदा गांधीजी आगगाडीने प्रवास करत होते. ते पहिल्या वर्गाच्या डब्यात बसले होते. काळ्या माणसाला पहिल्या वर्गाच्या डब्यात बसायला मनाई होती. इंग्रजांच्या दृष्टीने गांधीजीदेखील काळा माणूसच. गांधींना त्या डब्यात बसलेले पाहून गोऱ्या इंग्रजांना राग आला. तिकिटे तपासायला आलेला गोरा अधिकारी गांधीजींवर रागावला. तो म्हणाला, ''तू या डब्यात कसा बसलास?''

गांधीजी म्हणाले, ''हा डबा पहिल्या वर्गाचा आहे, आणि माझ्याजवळ पहिल्या वर्गाचं तिकीट आहे.''

तो अधिकारी पुन्हा ओरडला, ''तरी तू खाली उतर. काळ्या माणसाला पहिल्या वर्गाच्या डब्यात बसायला मनाई आहे.''

गांधीजी शांतपणे म्हणाले, ''हा अन्याय आहे. तो मी सहन करणार नाही. तुम्ही काळ्या माणसाचा राग का करता? हे माणुसकीला धरून नाही. मी खाली उतरणार नाही.''



तो गोरा अधिकारी चिडला. त्याने गांधीजींचे सामान डब्याबाहेर फेकले. गांधीजी मात्र आपल्या जागेवरच बसून राहिले. त्या अधिकाऱ्याने त्यांनाही डब्यातून बाहेर ढकलले. गांधीजी फलाटावर पडले. गाडी निघून गेली. गांधीजी तिथेच बसून राहिले. थंडी खूप पडली होती. सगळी रात्र त्यांनी थंडीत कुडकुडत काढली.

त्यांनी अन्यायाविरुद्ध लढण्याचे ठरवले. ते बरीच वर्षे आफ्रिकेतच राहिले. माणसे सगळी सारखीच. रंगामुळे त्यांच्यात भेदभाव करू नये. न्याय सगळ्यांना सारखाच मिळावा. गांधीजी त्यासाठी जन्मभर लढले.

ते सर्वांवर प्रेम करत. लोक त्यांना वडिलांसारखे मानत. त्यांना 'बापू' म्हणत.

* * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * * *

**अन्याय** — जुलूम. **माणुसकी** — चांगुलपणा.

# २७. चाहूल

मी परवा उजाडताच फिरायला गेलो. पावसाचे चिन्ह नव्हते. नवीन पालवी फुटलेली झाडे सुंदर दिसत होती. कोकिळा गात होती. 'पेरते व्हा, पेरते व्हा' करणारा पक्षी दूर ओरडत होता. एके ठिकाणी रस्त्यावरून साप गेलेल्या खुणा होत्या. त्याच्या शरीराचे ठसे मातीत उठलेले होते. उन्हाळ्याच्या दिवसांत साप रस्त्यावर येऊन पडतात. थंडगार धुळीत त्यांना बरे वाटते.

मला फिरताना पांढरे चाफे फुललेले दिसत होते. उन्हाळ्यात त्यांना बहर असतो. झाडावर पान एकही दिसत नाही. परंतु सर्वत्र फुले दिसतात. या झाडाला पाणी



लागत नाही. कुंपणात लावा, कुठेही लावा. दगडधोंड्यांमध्ये, खडकांमध्ये पांढरा चाफा आपला उभा. आता पावसाळा आला म्हणजे ही फुले जातील. लांब हिरव्यागार पानांनी हे चाफे भरून जातील. पावसाळ्यात सोनचाफ्याना बहर येतो, तर उन्हाळ्यात पांढऱ्या चाफ्यांना!

बकुळीचे बारीक असे फूल. किती सुवास! त्याच्या हृदयात मध असतो. फूल उचलावे तो त्यातून दोन-चार तरी मुंग्या निघतात.

फूल हे सृष्टीचे वैभव आहे. त्या त्या ऋतूत निराळे. आता पावसाळा आला म्हणजे रानात फुले फुलतील. या वसंत ऋतूतही लतावेलींना किती फुले! पळसही उन्हाळ्यात फुलतात. लाल दिसतात. पळसाच्या फुलांचा कुसुंबी रंग होतो.

मी हे वैभव बघत जात होतो. ऊन पडले होते. रानात चरायला सोडलेली गाईगुरे, त्यांना चरायला काही नव्हते तरी जमिनीला तोंड लावत. वाळलेली गवताची काडी तरी कुठे मिळेल ही इच्छा.

मी बघत जात होतो. तो गार वारा आला. आकाशात ढग जमले. मातीचा सुगंध आला. टपटप पाऊस सुरू झाला.

# २८. गाणी

## १. उगवला नारायण



उगवला नारायण लाल शेंदराच्या खापा
फुले अंगणात चाफा

उगवला नारायण करी कसा लखलख
झाडते ही मैना पंख!

उगवला नारायण आभाळ भडक लाल
काय झोकला गुलाल?

उगवला नारायण जळते तांबडी ज्योत
आला लहरा मारत

उगवला नारायण पहा उजेड दुरून
लाल भडके अगीन

उगवला नारायण तिरीप पिवळी छान
हासते हिरवे रान

## २. गोरि गोरि पान

गोरि गोरि पान, फुलासारखी छान
दादा मला एक वहिनी आण ।।

गोऱ्या गोऱ्या वहिनीला, अंधाराची साडी
अंधाराच्या साडीला, चांदण्यांची खडी
चांदण्यांच्या खडीला, बिजलीचा वाण ।।

वहिनीला आणायला, चांदोबाची गाडी
चांदोबाच्या गाडीला, हरणांची जोडी
हरणांची जोडी तुडवी, गुलाबाचे रान ।।

वहिनीशी गट्टी होता, तुला दोन थापा
तुला दोन थापा, तिला साखरेचा पापा
बाहुल्यांशी खेळताना, दोघे आम्ही सान ।।



## ३. नाचू गाऊ

घुंगुर पायी बांधुनि घेऊ
आपण सारे नाचू गाऊ ।।

गोलावरती फेर धरुनी
ताल सुरावर नाचत राहू ।।

फूलपाखरापरी मजेने
फुलाफुलांवर गुंगत राहू ।।

कुणी विमानापरी हवेतुन
उंच उंच वर हिंडत राहू ।।

माशापरि कुणी पाण्यामधुनी
मजेमजेने पोहत राहू ।।

कधी चांदण्या होउनि सगळे
शांतपणाने हासत राहू ।।

हासू खेळू खेळ मजेने
आपण सारे बहीणभाऊ ।।



स्वाध्याय

## १. गवताचं पातं

- **या कवितेत कोण काय करते ते लिहा.**

१. झऱ्यातलं पाणी ..........

२. निळं निळं पाखरू ..........

३. छोटासा मोती ..........

- **मुलाला कोण काय म्हणते ते लिहा.**

१. गवताचं पातं ..........

२. गारांची बरसात ..........

३. मनीचं पिल्लू ..........

- **खालील शब्दांमागे कवितेतील योग्य शब्द लिहा.**

(१) .......... पातं (२) .......... पाखरू

(३) .......... मोती (४) .......... पावसात

- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**

(१) बरसात .......... (२) लपाछपी ..........

●●●

## २. गुहा बोलते

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. सिंह भुकेने व्याकूळ का झाला?

..........

२. सिंह खूश का झाला?

..........

३. सिंह गुहेत दडून बसलेला असावा, असे कोल्ह्याला का वाटले?

.....................................................................................

.....................................................................................

- **'थकून-भागून' यासारखे जोडून येणारे दोन शब्द लिहा.**

१. ............................ २. ............................

- **'सिंह' या जागी 'मी' हा शब्द वापरून खालील वाक्ये पुन्हा लिहा.**

जसे – सिंह एका जंगलात राहत होता.
मी एका जंगलात राहत होतो.

१. थकून - भागून सिंह कोल्ह्याच्या गुहेत शिरला.

.....................................................................................

२. आता आयती शिकार सापडणार म्हणून सिंह खूश झाला.

.....................................................................................

३. सिंह उपाशीच होता.

.....................................................................................

## ३. मोर

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. आपला राष्ट्रीय पक्षी कोणता?

.....................................................................................

२. मोर कोठे राहतो?

..........

३. मोराचे अन्न कोणते?

..........

४. मोरावर हल्ला झाला तर तो काय करतो?

..........

- **योग्य जोड्या लावा.**

| | | |
|---|---|---|
| १. मुलांचा | थवा | .......... |
| २. पक्ष्यांचा | ताफा | .......... |
| ३. गुरांचा | घोळका | .......... |
| ४. उंटांचा | कळप | .......... |
| ५. विमानांचा | तांडा | .......... |
| | गुच्छ | |

- **विरूद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

१. कठीण × .......... २. आनंद × ..........

३. सरळ × ..........

- **मोराचे चित्र पाटीवर काढा.**

●●●

# ४. पीक

- **खाली कवितेच्या ओळी दिल्या आहेत, त्यांची वाक्ये करा.**

  १. दूध दिले वासराला ...............

  २. बळ दिले नांगराला ...............

  ३. फाळ दिला जमिनीला ...............

  ४. कस दिला कणसाला ...............

- **वाक्यात उपयोग करा.**

  १. बळ देणे. ...............

  २. पसा पसा भरून घेणे. ...............

- **धान्य शेतात पिकवण्यासाठी कोणकोणत्या गोष्टी कराव्या लागतात, ते थोडक्यात लिहा. (पाच ओळी)**

  ...............

  ...............

  ...............

  ...............

  ...............

●●●

# ५. साहस

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

  १. विनायक मुलांना कोणाची गोष्ट सांगत होता?

  ...............

२. मुले का घाबरली?

..............................................................................................

३. मुले का ओरडली?

..............................................................................................

४. विनायकने नागाला कसे पकडले?

..............................................................................................

५. या साहसी मुलाचे पूर्ण नाव काय?

..............................................................................................

- **असे कोण कोणास म्हणाले ते लिहा.**

१. "मी प्राण देईन, पण झाशी देणार नाही."

..............................................................................................

२. "अरे, तो नाग आहे. चावेल तुला. फीर मागे."

..............................................................................................

३. "नागाला भ्यालात, मग इंग्रजांशी कसे लढणार?"

..............................................................................................

- **पाठाच्या आधारे वाक्यात उपयोग करा.**

१. रंग भरणे. ..............................................................

२. पराक्रम गाजवणे. ..............................................................

३. निरखून पाहणे. ..............................................................

४. अर्धमेला होणे. ..............................................................

- **रिकाम्या जागी योग्य शब्द लिहा.**

१. विनायकने गोष्ट सांगितली.
विनायकने गोष्टी ..................

२. मुले घाबरली. मुलगा ..................

३. मी प्राण देईन. .................. प्राण देऊ.

●●●

## ६. शूर शिवबा

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. जिजामाता काळजी का करत होत्या?

..................

२. तोरणा घेण्यासाठी शिवबाने कोणती युक्ती केली?

..................

३. जिजामातेला शिवबाचा अभिमान का वाटला?

..................

४. शिवबाने मावळ्यांना स्वराज्याचे महत्त्व कसे पटवून दिले?

..................

..................

- **खालील शब्द पुन्हा लिहा.**

श्रम .................. किल्ला .................. सैन्य ..................

आशीर्वाद .................. युक्ती ..................

- **तुम्ही शिवबा आहात असे समजून तोरणा किल्ला कसा घेतला, ते घरी सांगा.**

●●●

# ७. फुलपाखरा

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. फुलपाखराला इवल्या इवल्या पंखांचा कोणता उपयोग होतो?

..........................................................................................

२. मुलाला फुलपाखराबरोबर काय काय करावेसे वाटते?

..........................................................................................

..........................................................................................

- **कवितेच्या ओळी पूर्ण करा.**

१. मऊमऊ ..........................................................................

२. ........................................................................ गमती जमती.

३. खूप मला रे ..................................................................

४. ........................................................................ खरोखरी.

- **फुलपाखराचे वर्णन करा.**

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

- **फुलपाखराचे चित्र पाटीवर काढा.**

●●●

# ८. दिनूचे बिल

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. दिनू वडिलांच्या दवाखान्यात काय ऐकत असे?

..................................................

..................................................

२. दिनूने आईला कशाकशाचे बिल दिले?

..................................................

..................................................

३. आईने दिलेल्या बिलात काय लिहिले होते?

..................................................

..................................................

- **असे कोण कोणास म्हणाले ते लिहा.**

१. "डॉक्टर, माझं पोट दुखतं, मला तपासा."

..................................................

२. "बिल म्हणजे काय हो?"

..................................................

३. "हे बघ, याला बिल म्हणतात. वाच."

..................................................

४. "तुझ्या बिलाचे पैसे पावले बरं दिनू!"

..................................................

- **कंसातील नको तो शब्द खोडा व वाक्ये पुन्हा लिहा.**

१. दिनूचे वडील (डॉक्टर, वकील) होते.

........................................................................................................

२. दिनू कधी कधी (क्रीडांगणावर, दवाखान्यात) जात असे.

........................................................................................................

३. उशाशी एका कागदावर (वडिलांनी, आईने) दिनूच्या नावाने करून ठेवलेले बिल होते.

........................................................................................................

........................................................................................................

- **वाक्यात उपयोग करा.**

१. कुरवाळणे. ........................................................................

२. गळा भरून येणे. ..................................................................

........................................................................................................

३. दृष्टीस पडणे. ....................................................................

........................................................................................................

- **खालील वाक्य दुरेघीत लिहा.**

"तुझ्या बिलाचे पैसे पावले बरं दिनू!"

........................................................................................................

........................................................................................................

●●●

# ९. महात्मा फुले

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. दरबार कशासाठी भरवला होता?

..........................................................................................

२. शेतकऱ्याला शिपायाने का अडवले?

..........................................................................................

३. शेतकऱ्याने सभेत काय सांगितले?

..........................................................................................

..........................................................................................

४. तो शेतकरी म्हणजे कोण होते?

..........................................................................................

- **वाक्यात उपयोग करा.**

१. तोंड भरून स्तुती करणे. ..........................................

..........................................................................................

२. नवल वाटणे. ..........................................

३. कानी घालणे. ..........................................

४. दिवस काढणे. ..........................................

- **पाठातील कोणतेही सहा जोडाक्षरयुक्त शब्द लिहा.**

१. .................... २. .................... ३. ....................

४. .................... ५. .................... ६. ....................

- **रिकाम्या जागी योग्य शब्द लिहा.**

**जसे — एक फूल. दोन फुले.**

१. एक फेटा. दोन ..............................

२. एक पगडी. तीन ..............................

३. एक शेतकरी. चार ..............................

४. एक वेश. पाच ..............................

- **समानार्थी शब्दांच्या जोड्या लावा.**

**जसे — गोष्ट-कथा**

**पुढे, नवल, कष्ट, सुरुवात, योग्य.**

**बरोबर, श्रम, आरंभ, आश्चर्य, समोर.**

१. .............................. ४. ..............................

२. .............................. ५. ..............................

३. ..............................

- **खालील वाक्य दुरेघीत लिहा.**

माझा भारत देश शेतकऱ्यांचा आहे.

..............................

..............................

## १०. जयहिंद एक घोष

- **कवितेतील खालील अर्थ असलेल्या ओळी लिहा.**

१. माझा भारत सर्व जगात फार सुंदर आहे.

..............................

२. माझी जन्मभूमी सुपीक असून येथे हजारो नद्या आहेत.

.....................................................................................

३. आम्ही सर्व भारतीय आहोत. आमची वेगळी जात किंवा पंथ नाही.

.....................................................................................

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. 'फुलबाग' हा शब्द कोणासाठी योजला आहे?

.....................................................................................

२. शत्रूस कोणाचा धाक वाटतो?

.....................................................................................

- **खालील शब्दांचे अर्थ लिहा.**

१. सुफला .................... २. सुजला ....................

३. मातृभूमी .................... ४. अन्य .......... ५. घोष ..........

- **'आम्ही फुलपाखरे आहोत' या वाक्यातील 'आम्ही' या शब्दाच्या जागी मी, तुम्ही, तो हे शब्द योजून वाक्ये तयार करा.**

१. मी .....................................................................................

२. तुम्ही .....................................................................................

३. तो .....................................................................................

- **खालील वाक्य दुरेघीत लिहा.**

भाषा अनेक अमुच्या जयहिंद एक घोष.

.....................................................................................

.....................................................................................

# ११. चतुर चिमणी

● **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. फुटाणा कोठे अडकला?

.....................................................................................................

२. चिमणी शेवटी कोणाकडे गेली?

.....................................................................................................

३. सुतार का घाबरला?

.....................................................................................................

● **विरूद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

हळू × ..................................... कमी × .....................................

बाहेर × ..................................... खाली × .....................................

● **खालील शब्दांसमोर कंसातील योग्य शब्द लिहा.**

**(बागकाम, बांधकाम, शिवणकाम, मातकाम, लाकूडकाम.)**

१. सुतार ..................................... ३. शिंपी .....................................

२. कुंभार ..................................... ४. गवंडी .....................................

●●●

# १२. मुक्तागिरी

● **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. मुक्तागिरी येथील गुंफा, लेणी आणि देवळे कोणी बांधली आहेत?

.....................................................................................................

..............................................................................................

२. जैनांच्या धर्मगुरूंना काय म्हणतात?

..............................................................................................

३. नाग नदीच्या पात्रातील दगडांचे आकार कसे दिसतात?

..............................................................................................

..............................................................................................

- **योग्य जोड्या लावा.**

| | |
|---|---|
| १. झाडाझुडपातून लपतछपत जाणारी | मोठमोठी झाडे |
| २. उंचावरून कोसळणारे | नाग नदी |
| ३. दाट सावली देणारी | धबधबे |
| ४. नागासारखी वळणे घेत वाहणारी | पायवाट |
| | पाणी |

१. .............................................. ..................

२. .............................................. ..................

३. .............................................. ..................

४. .............................................. ..................

- **कंसात दिलेले योग्य शब्द दिलेल्या शब्दांपुढे लिहा. (वळणे, फुले, रंग, वेली, पाणी)**

१. हिरव्यागार ..............................

२. रंगीबेरंगी ..............................

३. फेसासारखे ..............................

४. दुधासारखा ..............................

- 'मुक्तागिरी'चे चार ओळींत वर्णन करा.

.............................................................................................

.............................................................................................

.............................................................................................

.............................................................................................

●●●

## १३. मला वाटते

- मुलीला काय करावेसे वाटते ते लिहा.

१. विमानात बसून — ..........................................

२. नौकेत बसून — ..........................................

३. डोंगर चढून — ..........................................

- खालील शब्दांचा वाक्यात उपयोग करा.

१. अफाट ..........................................

२. सुंदर ..........................................

३. निळा ..........................................

- विरुद्ध अर्थाचे शब्द लिहा.

१. काळी × .................... २. समोर × ....................

- कंसातील योग्य शब्द वापरून वाक्य पूर्ण करा.

(रस्त्यावरून, रुळावरून, समुद्रातून, आकाशात)

१. विमान .............................. उडते.

२. आगगाडी .............................. चालते.

३. जहाज .............................. जाते.

४. मोटार .................................. धावते.

•••

## १४. अजाबराव

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. अजाबराव सकाळी उठून काय काय करू लागले?

..................................................................................

..................................................................................

२. झाडाला पाणी घालत असताना नोकराने काय पाहिले?

..................................................................................

..................................................................................

३. नोकराला अजाबरावाचा कोणता वेडेपणा दिसून आला?

..................................................................................

..................................................................................

४. स्वप्नात खिळा रुतू नये म्हणून नोकराने कोणती युक्ती सांगितली?

..................................................................................

..................................................................................

- **तुम्ही करता ते दुसऱ्याला करायला सांगा.**
  **जसे — मी झाड लावतो. तू झाड लाव.**

१. मी झाडांना पाणी घालतो. तू झाडांना पाणी ..................

२. मी खेळतो. तुम्ही ..................................

३. आम्ही अभ्यास करतो. तूही अभ्यास ........................

● **वाक्यात उपयोग करा.**

१. बारकाईने पाहणे. ........................

........................

२. डोळ्यांत पाणी येणे. ........................

........................

३. गळा काढून रडणे. ........................

........................

●●●

# १५. ताराबाईची सर्कस

● **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. ताराबाई सर्कशीत कोणकोणते खेळ करून दाखवी?

........................

........................

२. ताराबाईने वाघाच्या जबड्यात मान दिली तेव्हा लोकांवर काय परिणाम झाला?

........................

........................

● **विरूद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

१. जुनी × ........................ २. धीट × ........................

● **खालील शब्द लिहा.**

१. सर्कस .......... २. शक्ती .......... ३. स्वतः ..........

४. श्वास .......... ५. हत्ती ..........

● **वाक्यात उपयोग करा.**

१. रोखून पाहणे. ..........

..........

२. खिळून राहणे. ..........

..........

●●●

# १६. झोका

● **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. या कवितेत झोका घेण्यापूर्वी काय काय करा, असे म्हटले आहे?

..........

..........

२. झोका वेगात आल्यावर काय काय घडले?

..........

..........

● **ओळखा.**

१. वर वर जातो खाली खाली येतो,
पोटात तुमच्या गुदगुल्या करतो, असा कोण तो?

..........

२. गार गार लागतो, अंगाला झोंबतो,
सदान्‌कदा पिंगा घालतो, असा कोण तो?

..........................................

•••

## १७. बैल झपाटला

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. सरदार उठावा म्हणून पाटलांनी काय काय प्रयत्न केले?

..........................................

..........................................

२. बैल उभा राहावा म्हणून डॉक्टरांनी काय काय केले?

..........................................

..........................................

- **खाली दिलेल्या शब्दांच्या पाठीमागे पाठातील योग्य शब्द लिहा.**

**जसे** — चिमूटभर मीठ.

१. .......................... पोती.

२. .......................... माती.

३. .......................... मिरच्या.

४. .......................... बिब्बा.

- **खालील वाक्यांचा योग्य क्रम लावून वाक्ये पुन्हा लिहा.**

बैल पाय झटकून उभा राहिला.

बैल काही उठेना.

खंडू पाटलांना अतिशय आनंद झाला.

पायात गेलेला खिळा डॉक्टरांनी उपसून काढला.
बैल एकदम बसला.

१. ..........

२. ..........

३. ..........

४. ..........

५. ..........

- **खालील वाक्य दुरेघीत लिहा.**

धूप, दीप, अंगारे हे औषध नव्हे.

..........

..........

●●●

## १८. एक धरण

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. नदीच्या पाण्याचे उपयोग कोणते?

..........

..........

२. धरणे कशासाठी बांधतात?

..........

..........

३. जायकवाडी धरण कोणत्या नदीवर बांधले आहे?

..........................................................................................

४. तलावाला 'नाथसागर' हे नाव का दिले आहे?

..........................................................................................

● **योग्य जोड्या लावा.**

| | | |
|---|---|---|
| १. नदी | १. .............................. | १. नाथसागर |
| २. धरण | २. .............................. | २. गोदावरी |
| ३. तलाव | ३. .............................. | ३ ज्ञानेश्वर |
| ४. पैठण | ४. .............................. | ४. जायकवाडी |

● **विरूद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

१. मोठे × ........ २. लांब × ........ ३. उंच × ........

●●●

## १९. नसती उठाठेव

● **या कवितेतील गोष्ट थोडक्यात लिहा.**

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

........................................................................................................

........................................................................................................

........................................................................................................

•••

# २०. राणीची झोप

- **असे कोण कोणास म्हणाले ते लिहा.**

१. "मी एक उपाय सुचवतो."

........................................................................................................

२. "पाहिलीत ही न उमललेली कळी?"

........................................................................................................

३. "तुला कळी टोचत होती ना?"

........................................................................................................

४. "टोचत होता माझा आळशीपणा!"

........................................................................................................

- **कंसातील योग्य शब्द वापरून वाक्य पूर्ण करा.**

**(फुले, रात्रभर, तहानेने, झोप, राणीच्या, कळ्या)**

१. "महाराज, गादीवर .................... अंथरावीत."

२. "माझ्या पाठीला .................... काहीतरी टोचत होतं."

३. राणीला .................... येत नसे.

४. .................... प्रवासासाठी ज़हाज दिले.

५. .................... राणी व्याकूळ झाली.

- **खालील वाक्य दुरेघीत लिहा.**

"मला टोचत होता माझा आळशीपणा!"

........................................................................................................................

........................................................................................................................

●●●

## २१. सोन्याची कुऱ्हाड

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. आजोबांचा प्रामाणिकपणा कसा दिसून आला?

........................................................................................................................

........................................................................................................................

२. लाकूडतोड्याने देवदूताला कसे फसवले?

........................................................................................................................

........................................................................................................................

३. लाकूडतोड्यावर रडण्याची पाळी का आली?

........................................................................................................................

........................................................................................................................

४. देवदूताने लाकूडतोड्याला काय उपदेश केला?

........................................................................................................................

........................................................................................................................

- **वाक्यात उपयोग करा.**

१. तोंडाला पाणी सुटणे. ..........................................................

........................................................................................................................

२. खट्टू होणे. ........................................

........................................

- **लोखंडापासून तयार होणाऱ्या पाच वस्तूंची नावे लिहा.**

१. .......... २. .......... ३. .......... ४. .......... ५. ..........

- **रिकाम्या जागी चा, चीं, चे, च्या यांपैकी योग्य अक्षर लिहा.**

१. माती .......... भांडे. २. माती .......... पणती.

३. माती .......... गणपती ४. माती .......... चुली.

●●●

## २२. रोपटे

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. रोप वाढवण्यासाठी काय काय करावे?

........................................

२. झाड वाढल्यावर काय काय होईल?

........................................

........................................

- **खालील शब्दांचा वाक्यात उपयोग करा.**

१. हिंदोळा ........................................

२. शीतल ........................................

३. टिकल्या ........................................

४. लेकरे ........................................

- **खालील शब्दांसाठी कवितेत आलेले शब्द लिहा.**

१. झोका .......... २. नभ .......... ३. रवी ..........

- **खालील वाक्य दुरेघीत लिहा.**

१. वृक्षवल्ली आम्हां सोयरे.

..........................................................................................

..........................................................................................

●●●

## २३. शिष्यांची परीक्षा

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. मातीचा पक्षी कोठे टांगला होता?

..........................................................................................

२. बाण लावल्यावर अर्जुनाला काय दिसले?

..........................................................................................

३. नेमबाजी केव्हा यशस्वी होते?

..........................................................................................

- **असे कोण कोणास म्हणाले ते लिहा.**

१. ''होय. मला तुम्ही दिसता, झाड दिसते, पक्षीही दिसतो.''

..........................................................................................

२. ''नाही. मला तुम्ही दिसत नाही, झाड दिसत नाही, फक्त पक्ष्याचे डोके दिसते.''

..........................................................................................

३. ''आता तू बाण सोडू नकोस. बाजूला हो.''

..........................................................................................

- **योग्य रचना करून वाक्ये पुन्हा लिहा.**

**जसे** —बाण सांगितले लावायला द्रोणाचार्यांनी.

द्रोणाचार्यांनी बाण लावायला सांगितले.

१. आवडता बनला शिष्य द्रोणाचार्यांचा.

.................................................................

२. ऐकून उत्तर झाला आनंद द्रोणाचार्यांना ते.

.................................................................

●●●

## २४. पवनचक्की

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. जहाज पुढे का जात आहे?

.................................................................

.................................................................

२. पंपाचा कोणता उपयोग होतो?

.................................................................

.................................................................

३. पवनचक्की का फिरते?

.................................................................

.................................................................

४. वीज निर्माण झाल्यानंतर होणारे दोन उपयोग लिहा.

..................................................................

..................................................................

- **समान अर्थाचे शब्द मोकळ्या जागी लिहा.**

| | | | |
|---|---|---|---|
| १. पवन | गती | १. पवन | .................. |
| २. शक्ती | मित्र | २. शक्ती | .................. |
| ३. वेग | बाई | ३. वेग | .................. |
| ४. सवंगडी | ताकद | ४. सवंगडी | .................. |
| | वारा | | |

- **मी कोण ते लिहा.**

१. माझ्यामुळे जहाजाला वेग मिळतो. ..................

२. मी उंचावर चाकासारखी फिरते. ..................

३. माझ्यामुळे रस्त्यावरचे दिवे लागतात. ..................

●●●

## २५. बदके

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. बदके कोठे पोहत आहेत?

..................................................................

२. चाफ्याची कळी कोणाला म्हटले आहे?

..................................................................

३. बदकाच्या मागोमाग पाण्यात कोण धावत आहे?

........................................................................................................

- **पाण्यात राहणाऱ्या दोन प्राण्यांची नावे लिहा.**

१. .............................. २. ..............................

- **विरूद्‌ध अर्थाचे शब्द लिहा.**

१. इवली × .............................. २. कोवळी × ..............

३. पांढरी × .............................. ४. मागून × ..............

- **रिकाम्या जागी कंसातील योग्य शब्द लिहा.**

**(धमक, शुभ्र, भडक, गार, कुट्ट)**

१. काळा .............. २. पांढरा .............. ३. पिवळा ..............

४. लाल .............. ५. हिरवा ..............

•••

## २६. बापू

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. महात्मा गांधींचे पूर्ण नाव काय होते?

........................................................................................................

२. गांधीजी पहिल्या वर्गाच्या डब्यात बसलेले पाहून इंग्रजांना राग का आला ?

........................................................................................................

३. गांधीजी गोऱ्या अधिकाऱ्यास काय म्हणाले?

......................................................................

४. गांधीजी जन्मभर कशासाठी लढले?

......................................................................

- **रिकाम्या जागी गाळलेले शब्द लिहा.**

१. गांधीजी .......... कामासाठी .......... गेले.

२. इंग्रजांच्या दृष्टीने .......... देखील .......... माणूसच.

३. गांधीजींचे .......... डब्याबाहेर ..........

४. .......... त्यांनी थंडीत .......... काढली.

- **विरूद्ध अर्थाचे शब्द लिहा.**

१. गोरा × .......... २. रात्र × .......... ३. उतरणे × ..........

- **तुम्हांस माहीत असलेल्या चार देशभक्तांची नावे लिहा.**

१. .......................... २. ..........................

३. .......................... ४. ..........................

•••

## २७. चाहूल

- **पूर्ण वाक्यात उत्तरे लिहा.**

१. झाडे सुंदर का दिसत होती?

......................................................................

२. उन्हाळ्याच्या दिवसांत साप रस्त्यावर का येऊन पडतात?

......................................................................

..............................................................................................

३. बकुळीच्या फुलातून मुंग्या का निघतात?

..............................................................................................

४. चरायला काही नसतानाही गाई-गुरे जमिनीला तोंड का लावत होती?

..............................................................................................

..............................................................................................

- **'दगड' या शब्दातील अक्षरांचा उपयोग करून तीन वेगवेगळे शब्द तयार करा.**

१. .................... २. .................... ३. ....................

- **रिकाम्या जागी योग्य शब्द भरा.**

१. फूल हे सृष्टीचे .................... आहे.

२. पावसाळा आला म्हणजे .................... फुले येतील.

३. लांब हिरव्यागार पानांनी हे .................... भरून जातील.

४. रस्त्यावरून .................... गेल्याच्या खुणा होत्या.

- **वाचा व पुन्हा लिहा.**

१. सृष्टी, वृष्टी, तृष्णा, कृष्ण.

..............................................................................................

२. ऋतू, ऋचा, ऋषी.

..............................................................................................

●●●

